एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)- १० अंतर्गत परिविक्षाधीन सहायक गट विकास अधिकारी, गट-ब यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाकरिता जिल्हा वाटप करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** RDD-14011/33/2025-RDD(Est-3A)/2

३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २८ मार्च, २०२५

**वाचा :**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २० जानेवारी, २०१४.
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टीआरएन-१११४/प्र.क्र.८३/१८-ब, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०१४.
३) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टीआरएन-०२१७/प्र.क्र.१०/सीपीटीपी, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१७.
४) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टीआरएन-०२१७/प्र.क्र.१०/सीपीटीपी, दिनांक १८ ऑगस्ट, २०२१.
५) **कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि-३, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२५.
६) **कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि-३, दिनांक १२ मार्च, २०२५.
७) **संचालक, सीपीटीपी, वनामती, नागपूर यांचे पत्र क्रमांकः** आस्था ०३२५/सीपीटीपी १०/ उन्नतीकरण/७५५/२०२५, दिनांक १३ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षेमधून सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्याबाबतचा निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक २० जानेवारी, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ५ व ६ येथील दिनांक २१ फेब्रुवारी, २०२५ व दिनांक १२ मार्च, २०२५ रोजीच्या कार्यालयीन आदेशांन्वये, राज्यसेवा परिक्षा-२०२२ अन्वये सहायक गट विकास अधिकारी, गट-ब या पदासाठी शिफारस प्राप्त ठरलेल्या अनुक्रमे ५७ व ६ अशा एकुण ६३ उमेदवारांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण

कार्यक्रम-१० अंतर्गत, परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली असून त्यांना यशदा, पुणे येथे दिनांक ०२ एप्रिल, २०२५ (म.पू.) रोजी रूजू होण्याबाबत कळविण्यात आलेले आहे. तसेच संचालक, सीपीटीपी, वनामती, नागपूर यांच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ७ येथील दिनांक १३ मार्च, २०२५ रोजीच्या पत्रान्वये राज्यसेवा परीक्षा-२०२२ अन्वये सहायक गट विकास अधिकारी, गट-ब पदासाठी शिफारस झालेल्या एकुण ६ प्रशिक्षणार्थी अधिकारी यांना एकत्रित पायाभूत प्रशिक्षण कार्यक्रम १०- संवर्ग बदलामुळे अभ्यासक्रमात सूट देण्यात आलेली असून त्यांना जिल्हा संलग्नतेच्या कार्यालयात रूजू होण्याच्या अनुषंगाने, मूळ प्रशासकीय विभागाकडून आदेश निर्गमित करण्याबाबत कळविण्यात आलेले आहे.

०२. त्यानुसार राज्यसेवा परीक्षा-२०२२ अन्वये सहायक गट विकास अधिकारी, गट-ब पदासाठी शिफारस झालेल्या व वनामती, नागपूर यांच्या उक्त पत्रांन्वये एकत्रित पायाभूत प्रशिक्षण कार्यक्रम १०- संवर्ग बदलामुळे अभ्यासक्रमात सूट देण्यात आलेल्या श्री.श्रीहरी सि. सोळंके, प्रशिक्षणार्थी अधिकारी यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक ०३ नोव्हेंबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, राज्य सेवा परीक्षा- २०२२ अन्वये सहायक गट विकास अधिकारी, गट-ब पदासाठी शिफारस झालेल्या आणि एकत्रित पायाभूत प्रशिक्षण कार्यक्रम १०- संवर्ग बदलामुळे अभ्यासक्रमात सूट देण्यात आलेल्या श्री. श्रीहरी सि. सोळंके, परिविक्षाधीन सहायक गट विकास अधिकारी, गट-ब यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी खालीलप्रमाणे जिल्हा परिषद वाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नाव | स्व-महसूल विभाग | स्व-जिल्हा | प्रशिक्षणासाठी देण्यात आलेली जिल्हा परिषद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.श्रीहरी सि. सोळंके | छत्रपती संभाजीनगर | लातूर | सोलापूर |

०२. संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे परिविक्षाधीन अधिकारी यांनी **दिनांक ०२ एप्रिल, २०२५ (म.पू.)** रोजी रूजू व्हावे व रूजू झालेबाबतचा अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत शासनास सादर करावा.

०३. सीपीटीपी-१० मधील संबंधित उमेदवारांचे वेतन व इतर अनुषंगिक भत्त्यांसाठी सेवार्थ प्रणालीमध्ये नोंद करणे, त्यांचे एनपीएस क्रमांक प्राप्त करून घेणे, त्यांच्या वेतनासाठी आहरण व

संवितरण अधिकारी नियुक्त करणे, सेवा पुस्तक तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरूवातीस एका महिन्याच्या कालावधीत करण्यात यावी.

**०४.** सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १३ नोव्हेंबर, २०१७ व दिनांक १८ ऑगस्ट, २०२१ अन्वये, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम रजांबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. या धोरणातील तरतुदीस अनुसरून जिल्हा संलग्नता या टप्प्यामध्ये परिविक्षाधीन उमेदवारांच्या रजेबाबत निर्णय संबंधित जिल्हास्तरावरील अधिकारी यांनी घ्यावा.

**०५.** सदर प्रशिक्षणाबाबतची कार्यक्रम पुस्तिका स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. सदर कार्यक्रम पुस्तीकेनुसार प्रशिक्षण पूर्ण करण्यात यावे. तसेच सद्यस्थितीत संवर्ग बदलामुळे प्रशिक्षणाच्या काही भागातून सूट देण्यात आलेल्या उक्त प्रशिक्षणार्थी अधिकारी यांना सूट देण्यात आलेल्या प्रशिक्षणाच्या कालावधीत, खातेनिहाय जिल्हा संलग्नतेसाठी कार्यरत असलेल्या जिल्ह्यामध्ये संबंधित सहायक गट विकास अधिकारी यांना दैनंदिन कामकाजात मदत करण्याच्या सूचना संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी द्याव्यात.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१८०२४८५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.03.28 19:03:08 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित प्रशिक्षणार्थी अधिकारी (ई-मेलद्वारे).

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व विभाग.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, वनामती, धरमपेठ अमरावती रोड, नागपूर.
८. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. सह सचिव (प्रशिक्षण), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, सर्व जिल्हे.
११. निवड नस्ती (कार्यासन आस्था-३ अ), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.